तालुका बीज गुणन केंद्र १)पालशेत, ता.गुहागर, जि. रत्नागिरी, २) सैदापूर, ता.कराड, जि.सातारा, ३) लोणेरे, ता.माणगांव, जि. रायगड येथील प्रक्षेत्रावर प्रक्षेत्रावर फळरोपवाटिका स्थापन करणेस मान्यता मिळणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- ताबिके-२०२०/प्र.क्र.८०/१३-अे,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १६ जुलै, २०२०

**संदर्भ** :-१) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ/फलो-२/नर्सरी स्था./१८२/२०२० दि.२३/०६/२०२०.

## प्रस्तावना:-

आयुक्त (कृषि) यांची संदर्भाधिन पत्रान्वये सादर केलेल्या अहवालप्रमाणे प्रस्तावित केलेल्या तालुका बिज गुणन केंद्र १)पालशेत, ता. गुहागर, जि. रत्नागिरी, २) सैदापूर, ता. कराड, जि.सातारा, ३) लोणेरे, ता. माणगांव, जि. रायगड येथील प्रक्षेत्रावर सिंचनाची सुविधा उपलब्ध असल्याने रोपवाटिका स्थापन करण्यास वाव आहे. सदर रोपवाटिका स्थापन झाल्यास भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजने अंतर्गत फळबाग लागवड व महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत कलमे/रोपांची गरज भागली जाईल. रोपवाटिका स्थापन केल्यास सदर रोपवाटिकांकरीता वेगळी पदे निर्माण करावी लागणार नाहीत. त्याचा प्रक्षेत्रावरील कोणत्याही घटकावर परिणाम होणार नाही व वित्तीय भार पडणार नाही. या प्रक्षेत्रांवर रोपवाटिका स्थापन केल्यास परिसरातील शेतकऱ्यांना कलमे/ रोपांची उपलब्धता होऊन फळबाग लागवड क्षेत्रात मोठया प्रमाणात वाढ होईल. त्यामुळे शेतकऱ्यांची आर्थिक परिस्थिती उंचावण्यास मदत होईल. प्रक्षेत्रास कलमे/ रोपे विक्रीपासून आर्थिक फायदा होईल. परिणामत: आजूबाजूच्या परिसरातील स्थानिक शेतकऱ्यांना मोठया प्रमाणावर रोजगाराच्या संधी निर्माण होतील, याबाबी विचारात घेता फळरोपवाटिका स्थापन करण्यासाठी मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय -

तालुका बीज गुणन केंद्राचे फळरोपवाटिकेत रुपांतर करावयाचा तपशील:-

| अ.क्र. | तालुका बीज गुणन केंद्राचे नांव | ता.बि.के. खालील एकूण क्षेत्र (हेक्टर) | फळरोपवाटिकेत रुपांतर करावयाचे क्षेत्र (हे.) |
|---|---|---|---|
| १ | तालुका बीज गुणन केंद्र, पालशेत, ता. गुहागर, जि. रत्नागिरी | ७.८३ हे. | ७.८३ हे |
| २ | तालुका बीज गुणन केंद्र, सैदापूर, ता. कराड, | १०.०० | ३.०३ हे. |
| ३ | तालुका बीज गुणन केंद्र,लोणेरे, ता. माणगांव, जि. रायगड | १०.०२ | १०.०२ हे. |

उपरोक्त तालुका बीज गुणन केंद्राच्या प्रक्षेत्रावर फळरोपवाटिका स्थापन करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देत आहे.

१) तालुका बीज गुणन केंद्राच्या असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्याकडूनच नविन फळरोपवाटिकेचे काम करून घेण्यात येईल. सदर फळरोवाटिकेसाठी नविन अधिकारी /कर्मचारी यांची पद निर्मीती करता येणार नाही.

२) स्थापन करण्यात आलेल्या नविन फळरोपवटिकेसाठी नव्याने आर्थिक तरतूद करण्याची मागणी करता येणार नाही.

३) नविन वित्तीयभार पडणार नाही, यांची दक्षता घ्यावी.

४) प्रक्षेत्रावरील कोणत्याही घटकावर परिणाम होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७१६१५१६३७५२०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.07.16 15:54:46 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
२. संचालक, (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. संचालक, (नि. व गु.नि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. विभागीय कृषि सहसंचालक, ठाणे विभाग, ठाणे.
५. विभागीय कृषि सहसंचालक, पुणे विभाग, पुणे
६. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, रत्नागिरी/सातारा/रायगड
७. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
८. महालेखापाल-१/२ , (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर
९. वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी/सातारा/रायगड
१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई -३२,
१२.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), कृषि व पदुम (कृषि व फलोत्पादन) विभाग, मंत्रालय,मुंबई.
१३.निवड नस्ती (१३-अे)